**मा. प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी, रायगड यांचे न्यायालयातील मुरुड पो. स्टे., जि.रायगड येथील गु.प्र.क्र.२८/२०१३, गु.प्र.क्र.१/२०१५, गु.प्र.क्र.१४/२०१५, गु.प्र.क्र.१५/२०१५, गु.प्र.क्र. १६/२०१५, गु.प्र.क्र. १७/२०१५, गु.प्र.क्र.१८/२०१५, गु.प्र.क्र.१९/२०१५ या गुन्हयामधून उद्भवणा-या ८ न्याय प्रकरणी शासनाच्या वतीने न्यायालयीन कामकाज पहाण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. श्री. खान अब्दुल वहाब यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०५१९/प्र.क्र.१८०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ** :- १) विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. एसपीपी-२०२०/यु.ओ.आर.०४/डी-१४, दिनांक ०६.०३.२०२०

**प्रस्तावना :-**

अर्जदार श्री. जगन्नाथ मल्हारी वाघरे व इतर यांनी विनंती केल्यानुसार मा. प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी न्यायालय, रायगड यांचे न्यायालयातील ८ न्याय प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड. श्री. खान अब्दुल वहाब यांची नियुक्ती संदर्भाधीन अधिसूचनेन्वये करण्यात आलेली आहे. उक्त न्याय प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. खान अब्दुल वहाब यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अर्जदार श्री. जगन्नाथ मल्हारी वाघरे व इतर यांनी विनंती केल्यानुसार मा. प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी न्यायालय, रायगड यांचे न्यायालयातील मुरुड पो.स्टे.जि. रायगड येथील गु.प्र.क्र.२८/२०१३, गु.प्र.क्र.१/२०१५, गु.प्र.क्र.१४/२०१५, गु.प्र.क्र. १५/२०१५, गु.प्र.क्र. १६/२०१५, गु.प्र.क्र.१७/२०१५, गु.प्र.क्र.१८/२०१५, गु.प्र.क्र. १९/२०१५ या गुन्हयामधून उद्भवणा-या ८ न्याय प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड. श्री. खान अब्दुल वहाब यांना सदर प्रकरण निकाली निघाल्याशिवाय त्यांच्या व्यावसायिक फी मध्ये कोणत्याही प्रकारे वाढ करण्यात येणार नाही, या अटीसह तसेच त्यांना व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत, या अटींसह खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अनुज्ञेय राहील:-

**" मा. प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी, अलिबाग या न्यायालयात**
प्रति खटला सुनावणी फी रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)"

२. ॲड. श्री. खान अब्दुल वहाब यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान प्रत्येक न्याय प्रकरण निकाली निघाल्यानंतरच करण्यात यावे. ॲड. श्री. खान अब्दुल वहाब यांना (८ न्याय खटले, प्रति खटला रु.१०,०००/- असे एकूण रुपये ८०,०००/- (अक्षरी रुपये ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम) या रकमेशिवाय इतर कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उप अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. " बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९- जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस दल, (२०५५ ०१६८), २८-व्यावसायिक सेवा " या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ २९२/२०/व्यय-७, दि. ०२/०९/२०२० अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०१०१९१८००३८२८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.19 18:02:25 +05'30'

**( किशोर भालेराव )**
उप सचिव (विधि), गृह विभाग

**प्रत,**

१. विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परीक्षेत्र, कोकण भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
२. पोलीस अधिक्षक, रायगड.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. जिल्हा लेखा व कोषागार अधिकारी, रायगड.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, रायगड.
६. ॲड श्री. खान अब्दुल वहाब,जी-३, चित्रकला को-ऑप हौ.सो.लि., एल.बी.एस.मार्ग, कुर्ला(प), मुंबई- ४०००७०.
७. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- पोल-१०.